**महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत... (कार्यक्रम)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- मफुवि-१४२४/प्र.क्र.१८१/७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३१.०३.२०२५.

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४, दि.१७.०१.२०२५, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.

२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-१५१९/प्र.क्र.६५/६-अे, दि.२६.०६.२०२३.

३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.२५.१०.२०२४.

४) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/लेखा-२ /११८०/२०२५ , दि.१४.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकान्वये, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमातंर्गत खर्चाचा एकूण अर्थसंकल्पीत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्याच्या सूचना वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. तसेच, दि.१७.०१.२०२५, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये कार्यक्रम खर्चाखालील ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाचे प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.०४ च्या पत्रान्वये राहुरी कृषि विद्यापीठास मागणी क्र. डी-३, २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण या मुख्य लेखाशिर्षाखालील ०१, पीकसंवर्धन (कार्यक्रम) २४१५००७२, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), अंतर्गत आकस्मिक निधी व संशोधन निधी करीता मंजूर तरतुदीतून निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५००७२), या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत आकस्मिक निधी व संशोधन निधी करीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना मुख्य लेखाशिर्ष २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन (२४१५ ००७२), या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (कार्यक्रम) अंतर्गत आकस्मिक निधी करीता रु.२८०.०० लाख व संशोधन निधी करीता रु.२८०.०० लाख असे एकूण रु.५६०.०० लाख (अक्षरी रु. पाच कोटी, साठ लाख फक्त) इतके अनुदान पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन खालीलप्रमाणे मंजुरी देत आहे.

**अ) आकस्मिक खर्च-**

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/उपलेखा शिर्ष | योजना/योजनेतंर्गत येणारे महाविद्यालय | मान्यता आदेश | सन २०२४-२५ करीता सुधारित अंदाज | वितरीत निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००७२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | डाळींब संशोधन केंद्र, लखमापूर | मफुवि.२००७/प्र.क्र. १६६/७-अे. दि.१२.०३.२०१२ | १९६०.०० | १४००.०० | ५.०० |
| २. | | कृषि महाविद्यालय, कराड, जि. सातारा | मफुवि.२०११/प्र.क्र. ८०/७-अे. दि.१९.११.२०१३. | | | ४५.०० |
| ३. | | कृषि महाविद्यालय, मुक्ताईनगर, जि.जळगांव | मफुवि.१४१६/प्र.क्र. ३७/८-अे. दि.१३.०४.२०१७. | | | ४५.०० |
| ४. | | कृषि महाविद्यालय, हळगाव, जि. अहमदनगर | मफुकृवि.१४१५/प्र.क्र. २२८/७अे. दि.०५.०७.२०१६. | | | ४५.०० |
| ५. | | कृषि विज्ञान संकुल, काष्टी अंतर्गत शासकीय कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय व कृषि अन्नतंत्रज्ञान महाविद्यालयाकरीता विविध इमारतींचे बांधकाम करणे. | मफुकृवि.१४२१/प्र.क्र. १४१/७अे. दि.१०.१२.२०२१. | | | ५०.०० |
| ६. | | कृषि विज्ञान संकुल, काष्टी अंतर्गत शासकीय कृषि महाविद्यालय, उद्यानविद्या महाविद्यालय व कृषि | मफुकृवि.१४२२/प्र.क्र. २८२/७अे. दि.०१.०६.२०२३. | | | ४५.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | अभियांत्रिकी व तंत्रज्ञान महाविद्यालयाकरीता विविध इमारतींचे बांधकाम करणे. | | | | |
| ७. | | मौ.पेठ, ता.वळवा, जि.सांगली येथे क्रांतीसिंह नाना पाटील शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय स्थापन करणे. | मफुकृवि.१४१९/ प्र.क्र. ०२/७अे. दि.२१.०६.२०१९. | | | ४५.०० |
| | | **एकूण** | | **१९६०.००** | **१४००.००** | **२८०.००** |

## ब) <u>संशोधन निधी</u>-

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उपलेखाशिर्ष | संशोधन प्रकल्प | प्रकल्पाचे ठिकाण | प्रशासकीय मान्यता आदेश | सन २०२४-२५ करीता सुधारित अंदाज | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००७२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | शाश्वत उत्पादन व मुल्यवर्धनासाठी सोयाबीन संशोधनाचे बळकटीकरण | कृ.सं.कं. कसबे डिग्रज | शासन निर्णय- मफुवि १४२२/प्र.क्र.२५३/७-अे दि.३१.०३.२०२३ | १९६०.०० | ४००.०० |
| २. | | कपाशी बी. टी. जणुके सरळ वाणामध्ये समावेश करुन कपाशीचे सरळ बी.टी. वाण विकसीत करणे | कापुस सुधार प्रकल्प राहुरी | | | ४००.०० |
| ३. | | काटेकार शेतीसाठी डिजीटल तंत्रज्ञानावर आधारीत सेन्टर ऑफ एक्सलेन्स | मफुकृवि, राहुरी. | | | ४००.०० |
| ४. | | हरभरा पिकाचे दुष्काळ सहनशिल वाण/जीन प्रारूपे निर्माण करणे | कडधान्य सुधार प्रकल्प, राहुरी | | | १०.०० |
| ५. | | रब्बी ज्वारीचे अधिक | ज्वारी सुधार प्रकल्प, राहुरी | | | १५.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | उत्पादनक्षम व पौष्टिक तसेच यंत्राव्दारे काढणीस सुलभ वाणांची निर्मिती करणे | | | | |
| ६. | | नॅनोटेक्नॉलॉजी पीक संरक्षणासाठी आणि उत्पादकता व उत्पादन वाढीसाठी वापर | जीवरसायन शास्त्र विभाग, पीजीआय, राहुरी. | | | २५.०० |
| ७. | | तेलबिया संशोधन केंद्र जळगाव या प्रकल्पाचे बळकटीकरण | तेलबीया संशोधन केंद्र, जळगाव | | | १५.०० |
| ८. | | शाश्वत उत्पादनासाठी भुईमुग पीक संशोधनाचे बळकटीकरण | क.सं. के. कसबे डिग्रज,सांगली | | | १०.०० |
| ९. | | महाराष्ट्रासाठी पाण्याचा ताण व क्षार सहनशील ऊस वाण संशोधीत करणे | मध्यवर्ती उस संशोधन केंद्र, पाडेगाव | | | २०.०० |
| १०. | | क्षारपड जमीन सुधरण्यासाठी संशोधन | कृ.सं.कें.कसबे डिग्रज,सांगली | | | १०.०० |
| ११. | | पिक रोग निदान केंद्र | विभागीय गहू संशोधन केंद्र, महाबळेश्वर | | | ५.०० |
| १२. | | मेटॅबोलोमिक्स प्रोफाईल ज्ञानावर आधारीत पिक वनस्पती प्रजनन | मफुकृवि, राहुरी | | | १०.०० |
| १३. | | आंतरराष्ट्रीय मानकानुसार किडनाशक अंशावर आधारीत संशोधन आधुनिकीकरण | किटकशास्त्र विभाग, राहुरी | | | ४०.०० |
| | | **एकूण** | | | १९६०.०० | २८०.०० |

२.  सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४, दि१७.०१.२०२५ ,दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/योजनांसाठी/बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांनी कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश/कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम, १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

८) सदरचा निधी हा विद्यमान आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत करण्यात येत असल्याने त्याचा विनियोग हा विद्यमान आर्थिक वर्षामध्येच करण्यात यावा.आहरित केलेला निधी हा बँक खात्यावर अखर्चित राहणार नाही, याची दक्षता घ्यावी.त्यानुषंगाने, कोषागारातून निधी आहरित करावा.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४, दि.१७.०१.२०२५, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०२.२०२५ च्या परिपत्रकान्वये, तसेच, नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१६५/का.१४३१, दि.२१.०३.२०२५ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१४०/व्यय-१, दि.३१.०३.२०२५ देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३३११२२२१३९४३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2025.03.31 22:22:35 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
२. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३. कुलगुरु/कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
५. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहिल्यानगर व उपकोषागार अधिकारी,राहुरी. जि. अहिल्यानगर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०. उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११. उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२. उप सचिव,कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३. उप सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.